# NITI BODH KATHA

# नीतिबोधकथा.

हें पुस्तक

मेहरबान बोर्ड आफ् एघुकेशन ह्यांच्या हुकुमावरून

मेजर क्यांडी साहेब पाठशाळेचे सुपरिंटेंडेंट

ह्यांनीं

नीतिकथा व बोधकथा ह्या पुस्तकांवरून

तयार केलें, तें

पुणे पाठशाळेकडील छापखान्यांत छापिलें

आवृत्ति चवथी.

मुकाम पुणें.

छापणार नारोरामचंद्र ठकार स॰ छापखाना

इसवी संन १८५६

शके १७७८

# अनुक्रमणिका.





मला उपकार फेडूं देत नाहींस तर माझें कांहींच गे-
ं नाहीं. तें समयीं मोलकऱ्यानें त्यापासून पांच रुपये
ऊन तो गेल्यावर लागलेच ते भिकाऱ्यास वांटून दिले.

कृपण म्हणून लोक निंदितात, त्याच द्रव्यानें जेव्हां तो लोकांचे अडचणी प्रमाणें आणि आपलें सामर्थ्य पाहून सत्पात्रीं दान करितो, तेव्हां कृपण हें त्याचें वाईट नांव जाऊन, लोक त्यास दाता असें म्हणतात, आणि त्याची प्रशंसा करितात.

ज्या शेतांत बीं पडलें असतें त्या शेतांत जर कोणी बीं पेरलें, तर तें जसें फुकट जातें, तसें जे सुखी आहेत, ज्यांस अडचण नाहीं, त्यांस द्रव्य दिलें असतां तें व्यर्थ होतें, त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. ह्यास्तव जे दीन, गरीब, दुबळे हातपाय थकल्यामुळें ज्यांस पोटास अन्न मिळविण्याचें सामर्थ्य नाहीं, अशांस जर द्रव्य दिलें, तर त्या द्रव्याचें सार्थक्य होतें.

जसें, बी पेरणारा चांगल्या शेतांत बी टाकितो, तें बीं पुष्कळपट होऊन पेरणाऱ्यास सुख देतें, तसें दीन दुबळे ह्यांस जें प्रीतीनें दिलें तें त्यांस सुख देऊन देणाऱ्यासही संतोष देतें, आणि तेणेंकरून ईश्वर त्यावर दया करितो. कां कीं, जो गरिबास देतो तो ईश्वरास देतो. ह्या प्रमाणें द्रव्याचा सद्व्यय झाला तर तो लोकांस आणि ईश्वरास मान्य होईल.

वय उत्तरोत्तर वाढत चाललें आहे. जर मी ह्या वयांत विद्या शिकलों नाहीं, तर पुढें मला ती साधणार नाहीं.

असें गोपाळाचें भाषण ऐकून त्याच्या बापानें संतोष पावून त्यास एका चांगल्या शिक्षकाचे स्वाधीन केलें. कितीएक दिवसांनंतर गोपाळ आपल्या बापाजवळ जाऊन त्याच्या पायां पडला. तेव्हां बापानें विचारिलें, मुला, काय काय शिकलास? तेव्हां गोपाळ जें जें शिकला होता तें सर्व त्यानें बापास म्हणून दाखविलें. तें पाहून बाप संतोष पावला, आणि मुलास एक मोहर देऊन बोलला, मुला, ह्या मोहरेचें तुला आवडेल तें तूं कर.

गोपाळ ती मोहर घेऊन बापाच्या पायां पडून गेला. नंतर तो आपल्या गुरूकडे जात असतां त्यानें कोणी रानांत रडतां ऐकिलें. मग रानांत जाऊन पाहतो तों एक मुलगा चिखलानें भरलेला रडत आहे. गोपाळ त्याजवळ जाऊन, गोड बोलून त्यास विचारितो, मुला, तूं कां रडतोस? तुला काय झालें? मुलगा त्या गोड बोलण्यानें आनंद पावून गोपाळास म्हणाला, मी लिहिणे

वाचणें सोडून खेळत होतों, तें पाहून माझ्या बापानें मला मारलें, म्हणून मी रानांत येऊन रडत बसलों आहें. मग गोपाळ त्या मुलास हितांच्या चार गोष्टी सांगून त्याला आपले बरोबर घेऊन गेला, आणि म्हणाला, मुला, एव्हां तूं लहान आहेस, म्हणून विद्येचें फळ काय आहे हे तुला समजत नाहीं; थोरपणीं समजेल. मीही तुझ्या सारिखाच उनाड होतों, पण सांप्रत मला विद्या चांगली वाटूं लागली, व तिचें फळही माझ्या दृष्टीस पडलें आहे. असें बोलून त्यानें आपली मोहर त्यास दाखवून, बापानें दिल्याची गोष्ट सांगितली.

सारांश, लहानपणीं विद्याभ्यासाचा कंटाळा येतो, आणि आईबापांचा तिरस्कार वाटतो; पण शाहाण्या मुलानें विचार करून निरंतर विद्याभ्यास करावा, म्हणजे पुढें वडिलांचा दयाळूपणा मनांत येईल, व विद्येचें फळही दिसून येईल.



## ५ दरिद्री विद्वान् आणि धनवान् मूर्ख.

कोणे एके समयीं एक दरिद्री विद्वान् आणि एक धनवान मूर्ख ह्यांचा फार स्नेह पडला; त्यावरून सर्व लोकांस वाटत असे कीं, विद्वानाचा स्नेही ही विद्वान् असेल. एके दिवशीं त्या दोघांस सभेचें बोलावणें आलें, तेव्हां ते दोघे सभेस गेले. तेथें त्यांचें स्वरूप जाणून सभेंतील लोकांनीं विद्वानाचा मात्र आदर केला. तें पाहून मूर्ख फार लाजून मनांत विचार करूं लागला. अरे, मी कसा मूर्ख झालों! जर मी विद्वान् असतों तर सर्वलोक मला मान देते. मी धनवान् आहें खरा, परंतु धन माझ्या बरोबर येत नाहीं; विद्या सर्वत्र बरोबर जाते; तर आजपासून सर्व द्रव्य खर्चून विद्या संपादण्याविषयीं मी प्रयत्न करीन, असा त्यानें त्या वेळीं तेथें निश्चय केला.

मग सभा उठल्यावर तो वाटेनें विद्वानास म्हणतो, अरे मित्रा, जर तूं मजवर कृपा करशील तर आपणा उभयतांचें कल्याण होईल. विद्वानानें विचारिलें, हें कसें? मूर्ख बोलला, माझें सर्व धन तूं घे आणि तुझी

विद्या मला दे. विद्वान् म्हणाला, तुझ्यानें मला द्रव्य देव वेल, ह्यांत कांहीं कठीण नाहीं, परंतु तुला विद्या देणें माझ्या स्वाधीन नाहीं. हें ऐकून धनवान् मूर्ख म्हणतो, अरे, मी द्रव्याचा लोभ सोडावयास सिद्ध झालों; आणि तुला विद्येची ममता सुटेना काय? विद्वानानें उत्तर केलें, ह्या विषयीं म्या सांगितल्यानें तुझी खातरी व्हावयाची नाहीं, तर चला, आपण राजाकडे जाऊं, तो ह्या गोष्टीचा निवाडा करील.

असें बोलून ते दोघे राजाकडे गेले, आणि सर्व वर्तमान त्यांनीं राजास सांगितलें. राजानें तें सर्व ऐकून घेऊन तत्क्षणींच दरिद्री विद्वानास धन देऊन धनवान् केलें, आणि मूर्खास सांगितलें कीं, अरे, जर अकस्मात् कोणास विद्या देतां येती, तर आतांच तुला विद्वान् केलें असतें. असो, आतां जर तुला विद्येची इच्छा असली, तर तूं शाळेंत जाऊन विद्याभ्यास कर, म्हणजे काळेंकरून विद्वान् होऊन प्रतिष्ठा पावशील.

सारांश, विद्येकडून विद्वानास धन सहज मिळतें, परंतु विद्याहीनास विद्या सहज मिळत नाहीं, तीस अभ्यासच केला पाहिजे. ह्यास्तव जीं मुलें लहानपणा

पासून सुविधेचा अभ्यास करतील ती सुख भोगितील.

---

## ६ अहंकार.

धनवान् लोकच अहंकारी असतात असें नाहीं, दरिद्री लोकही पुष्कळ अहंकारी असतात. जर धनापासून अहंकार उत्पन्न होतो म्हणावें, तर सर्व धनवान् लोकांस अहंकार असावा; तसें सर्वत्र दिसत नाही. त्या स्तव अहंकाराचें कारण धन नव्हे; मन होय. मी सर्वांहून मोठा असें मानणें, हा केवळ मनाचा धर्म आहे, असें सुज्ञलोक बोलतात. जे अहंकारी मनुष्य ते असें समजतात कीं, सर्वांपेक्षां आम्ही मोठे, आम्हांपेक्षां दुसरा कोणी मोठा नाहीं, व आम्हासारखाही कोणी नाहीं, त्यामुळें ते दुसऱ्याचा अपमान करितात्. तर अशा मनुष्यांस उंच डोंगरा प्रमाणें मोजावें. जसें उंच डोंगरावर पाणी जात नाहीं, तसें अहंकारी मनुष्यांस ज्ञान प्राप्त होत नाहीं, परंतु जसें खोलवट जमिनीस पाणी सहज मिळतें, तसें निरहंकारी मनुष्यास ज्ञान सहज प्राप्त

होनें. ह्यास्तव ज्याला ज्ञानाची इच्छा आहे, त्यानें कधीं अहंकार धरूंनये, आणि मी थोर असें मानूंनये, जसें झाड फळांच्या भारानें लवतें, किंवा जशा साळीच्या काड्या धान्याच्या भारानें जमिनीपर्यंत लवतात; तसें मनुष्यानें ज्ञान संपादून नम्रतेनें वर्तावें, त्यांतच त्याचा थोरपणा आहे. कोणी वयानें मोठा झाला म्हणूनच त्यास थोरपणा येतो, असें नाहीं, तर थोरपणाचें कारण विद्या होय. म्हणून सर्वांनीं अभिमान सोडून विद्या शिकावी, म्हणजे त्यांस थोरपणा येऊन सर्व गोष्टींचा लाभ होईल. वयानें मोठा झाला म्हणून कोणी विद्येविषयीं आळस करूं नये, व लाज धरूंनये. विद्या लहानपण्यावर किंवा मोठेपण्यावर नाहीं, मेहनतीवर आहे.

सारांश, अहंकाराचें तोंड काळें. अहंकारा सारखा दुष्ट नाहीं. अहंकारानें बहुतांस बुडविलें आहे, म्हणून निरभिमानी असणें हा गुण लहानपणापासून मुलांनीं अंगीं बाळगावा.

## ७ विद्याभ्यासापासून हित.

जर तुला पाहिजे धन,
तर करीं विद्येचें संपादन,
विद्या नसतां तेंच धन,
संकटीं पाडी मनुष्या,

ही म्हण कोणी एका पुरुषानें एका राजापाशीं म्हटली. राजानें तिच्या अर्थाचा खरेपणा पाहावयासाठीं आपला एक मुलगा विद्याभ्यासाकरितां एका पंडिताचे स्वाधीन केला, आणि सांगितलें कीं, मुलानें नित्य नवा एक धडा शिकावा. दुसरा मुलगा होता, त्यास प्रतिदिवशीं एकेक उंच रत्न देऊं लागला. पहिल्या मुलाची बुद्धि विद्याभ्यासाच्या योगानें दिवसें दिवस जसजसी वाढत चालली, तसतसा तो नम्र, विनयी, सुशील, आणि विद्वान् होत चालला, आणि विद्याभ्यासाकडे चित्त अधिक अधिक लावूं लागला. इकडे दुसरा मुलगा आपल्या संपत्तीच्या योगानें दिवसें दिवस अधिक अधिक गर्विष्ठ आणि उन्मत्त होत चालला, आणि विद्येस तुच्छ मानूं लागला. ते दोघे मोठे झाले तेव्हां दूरदेशीं प्रवासास

जावयाकरितां निघाले. धनवान् होता त्यानें पुष्कळ धन संगातीं घेतलें. विद्वान् होता त्यानें प्रवासीं विद्याच एक सोबती होय, असें समजून कितीएक पुस्तकें मात्र घेतलीं.

धनवान् मुलगा एका नगरास गेला, तेथें त्याजपाशीं रांडबाज व जुगारी ह्यांची मंडळी मिळाली, त्यांच्या वाईट बुद्धीस लागून त्यानें कितीएक दिवसांत दुर्व्यसनांत व दुष्कर्मांत आपल्या द्रव्याचा खर्च केला. शेवटीं कर्ज पुष्कळ झालें, तेव्हां लोकांनीं फिर्यादी करून त्यास बंदीशाळेंत घातलें.

विद्वान् मुलगा होता तो एका राजधानीस गेला, तेथील राजानें त्याच्या चालचर्येवरून त्याच्या विद्येची परीक्षा करून त्याशीं परिचय केला. तो परिचय चांगला झाल्यावर राजानें त्यास एक वाडा बांधून दिला. शेवटीं त्या राजाची प्रीति त्यावर इतकी बसली कीं, राजानें त्यास आपली कन्या दिली. नंतर चाकर माणसें व शिपाईलोक बरोबर देऊन त्याला त्याच्या देशीं पाठवून दिलें. तो आपल्या नगराजवळ गेला तेव्हां नगरांत गलबल झाली, ती ऐकून त्याचा बाप घाबरला, इन-

ल्यांत जामुदानें येऊन सांगितलें कीं, महाराज, आपला पुत्र येत आहे. मग राजानें प्रधान व सोयरे धायरे सामोरे पाठवून वाजत गाजत पुत्रास महालांत आणिलें, आणि त्यास आलिंगन देऊन जवळ बसविलें; व मोठा उत्साह केला. पुढें राजकामांत त्याची बुद्धि व कल्पाना चांगली आहे, असें पाहून सर्व राज्याचा कारभार त्याच्या स्वाधीन केला.

तो द्रव्यवान् मुलगा तों पर्यंत बंदिशाळेंतच होता, तें वर्तमान ह्या विद्वान् मुलानें ऐकून त्याचें ऋण फेडून त्यास सोडवून राजधानीस आणिलें. ह्या प्रकारें त्या राजानें विद्या आणि संपत्ति ह्यांच्यामध्यें काय भेद आहे ह्याचा प्रत्यक्ष अनुभव पाहिला.

---

## ८ विद्येचें फळ.

गोविंदा नामें एक मुलगा सूर्योदयाचे पूर्वीं उठून आपलें दप्तर बगलेंस मारून शाळेस जात असे. तो फार लहान होता, आणि शाळा तर फार दूर, सुमारें एक कोसावर होती. असें असतांही इतकें दूर जाण्या-

स त्याला श्रम अगदीं वाटत नसे. कां कीं, शाळेस जाऊन विद्या पढेन, परंतु टवाळ मुलांप्रमाणें रस्त्यांत खेळणार नाहीं; असें त्याच्या मनांत नेहमीं वागत असे.

एके दिवशीं तो शाळेस जात असतां दुसऱ्या गांवचा भोळानाथ नामें एक मुलगा त्यास भेटला. तो भोळानाथ वयानें गोविंदापेक्षां मोठा होता, परंतु मूर्ख होता; तो कधीं शाळेस जात नसे, म्हणून त्यास एक अक्षर किंवा एक अंक लिहितां वाचतां येत नसे. सर्वदा खेळणें, टवाळी करणें, ह्यां वांचून दुसरें कांहीं त्यास कळत नव्हतें. असा तो मुलगा पाहून गोविंदा त्यास अनेक प्रकारांनीं बोध करून म्हणाला, बाबा, खेळणें व पोरखेष्टा सोडून देऊन मजबरोबर शाळेस चल; पहा, विद्या अवघ्या वस्तूंमध्यें उत्तम आहे; ती तूं जाणत नाहींस. दुसऱ्या वस्तूंची किंमत होती; परंतु विद्येची किंमत नाहीं; दुसऱ्या वस्तू चोर नेतील, परंतु विद्या त्यांच्यानें नेववत नाहीं; दुसऱ्या वस्तूंचें दान केलें असतां त्या आपणास नाहींश्या होतात; परंतु विद्येचें दान केलें असतां ती वाढते. हें ऐकून भोळानाथ बोलला, मी शाळेस कधीं जाणार नाहीं; मला लिहिण्या वाचण्याची गरज नाहीं. शि-

ळण्यापेक्षां खेळणें मला फार चांगलें वाटतें, तर तूंच म-
जबरोबर ये, म्हणजे आपण दोघेजण मिळून एकीकडे
जाऊन खेळूं. गोविंदानें उत्तर केलें, अरे, हें फार वाईट
कर्म होय; तरी तूं मला बोलावितोस म्हणून मी येईन,
पण केव्हां? मी अगोदर शाळेस जाईन; तेथून आल्या-
वर घरीं आईबाप काय काम सांगतील तें करीन; त्यां-
स बाजारांतील जिन्नस आणून देईन; नंतर त्यांची आ-
ज्ञा घेऊन तुजबरोबर पाहिजे तर क्षणभर खेळावयास
येईन. आतां तूं मजबरोबर शाळेस चल, नाहीं तर घ-
रीं जाऊन आपल्या आईबापांची सेवा कर. भोळानाथ
म्हणाला, आईबापांच्या सेवेविषयींचा उपदेश मला आ-
वडत नाहीं, परंतु शाळेस कशाकरितां जावें, व त्याचें
फळ काय, तें सांग.

गोविंदा बोलला, ऐक! जर तूं शाळेस नयेतां
असाच खेळण्यांत व मुर्खपणांत राहशील, तर तुला
कधीं चांगली रीत लागणार नाहीं, आणि आईबापांच्या
आज्ञेंत जर राहाणार नाहींस, तर तुझें कधीं बरें हो-
णार नाहीं. मी तसा होण्यास इच्छीत नाहीं. मी आई-
बापांची सेवा नित्य करीन; कारण, तीं मजवर फार प्रीति

करनात; माझा प्रतिपाल करण्यांत त्यांस फार श्रम हो-
तात; जन्मल्यापासून माझें कल्याण तीं चिंतितात; ह्या
स्तव तीं आज्ञा करतील ती मला अवश्य मानली पाहि-
जे. आतां विद्येचें फळ काय म्हणून तूं विचारितोस
तर ऐक. विद्येनें सर्व प्रकारांनीं आपलें कल्याण हो-
तें; विद्येच्या योगानें सर्वत्र मान व धन ह्यांचा लाभ हो-
तो. ज्या काळीं आईबाप म्हातारपणामुळें काम कर-
ण्यास असमर्थ होतात, व त्यांचा उपाय चालेनासा हो-
तो, त्या काळीं मुलांनीं विद्येवांचून कोणत्या साधनानें
त्यांचा चरितार्थ चालवावा? शंभर मूर्ख पुत्रांपेक्षां एक
गुणवान् पुत्र चांगला. मूर्खांचा आदर कोणी करीतना-
हीं. करावें काय, न करावें काय, हा विचार मूर्खास क-
ळत नाहीं; आणि आपणास कोणी उत्पन्न केलें, व ज-
न्मास आल्याचें फळ काय, हें ही त्यास समजत नाहीं.
ह्याकरितां विद्या अवश्य संपादिली पाहिजे.

ह्या प्रकारें करून गोविंदापंडिता प्रमाणें बोलत
असतां कोणीएक पुरुष हातांत पत्र घेऊन तेथें आला,
व तें पत्र भोळानाथाच्या हातीं देऊन बोलिला, महाराज,
मी अज्ञान आहें; हें पत्र हातांत घेऊन गांवभर शोध क-

रीत आलों; परंतु आझून हें कोणाचें, व कोणीकडलें, ह्याचा थांग लागत नाहीं; तर कृपाकरून हें पत्र मला वाचून दाखवा. असें तो बोलिला, परंतु भोळानाथ तें काय वाचतो? त्यांतलें एक अक्षर ही त्यास समजलें नाहीं.

नंतर तें पत्र गोविंदाजवळ देतांच त्यानें वाचून, कोठून आलें, व त्यांत मजकूर काय, हें त्या माणसास सांगितलें. हें पाहून भोळानाथ फार लाजला, आणि पूर्वी गोविंदा जें जें बोलिला होता त्या सर्वांचें स्मरण करून म्हणाला, बाबा, तुझ्या तोंडच्या गोष्टी ऐकून मला ज्ञान झालें. विद्या उत्तम वस्तु खरी, हें मी आतां समजलों, व म्यां अनुभवूनही पाहिलें आहे. पूर्वी मी शाळेस जात नव्हतों, त्याचा मला आतां मोठा खेद होतो, तर आतां मी खेळ व द्वाडगुण टाकून तुजबरोबर शाळेस येतों. असें बोलून तो गोविंदाबरोबर शाळेस जाऊं लागला, आणि ते दोघे विद्या पढून मान्यता पावले.

सारांश, विद्येविषयीं चांगला उपदेश कोणी करील तो सर्वांनीं अवश्य ऐकावा, आणि त्याप्रमाणें वागावें, म्हणजे त्यांचें सर्वप्रकारांनीं कल्याण होतें. नाहीं तर हेवणा केल्यास त्यांस दुःखच भोगावें लागतें.

# ९ चांगली बुद्धि.

एका गृहस्थास रामचंद्र नामें एक मुलगा होता; त्याला वय अगदीं थोडें असून बुद्धि फार चांगली होती. रामचंद्र हा बापाचा एकुलता एक मुलगा होता. त्यास लिहितां वाचतां कांहीं येत नव्हतें; कारण कीं, तो कधीं शाळेंत गेला नव्हता; परंतु तो समजत होता, कीं विद्याहीन असणें हें चांगलें नव्हे; ह्यास्तव आपणास विद्या यावी अशी त्यास मोठी इच्छा झाली. पहिल्यानें गुरूनें सांगितलेलें रामचंद्रास चांगलें समजत नसे; परंतु कांहीं काळानंतर विद्याभ्यास करून त्याचा समज चांगला होऊं लागला. त्याच्या बरोबरचे शिकणारे जितके होते त्या सर्वांपेक्षां तो लहान असतां विद्येनें त्यांमध्यें पहिली जागा पावला. त्याच्या तोंडांतून वाईट शब्द कधींही निघत नसे, आणि वाईट काम त्याजकडून कधींही घडत नसे, आणि तो सर्वदा अवघ्या मुलांशीं प्रीतीनें बोलत असे. ह्यास्तव त्यास शिक्षा करण्याचा प्रसंग गुरूस कधींच आला नाहीं. तो तीन वर्षें शाळेंत राहून फार चांगलें शिकला. तो जें शिकला होता त्यांत त्याची तयारी पाहून

त्याचे आईबाप व भाऊबंद त्याजवर फार प्रीति करूं लागले. एके दिवशीं तो शाळेंतून आल्यावर त्याच्या बापानें त्यास खाऊकरितां चार पैसे दिले, ते घेऊन मोठ्या आनंदानें तो बाजाराकडे चालला, आणि वाटेनें जातांजातां विचार करूं लागला कीं, बाजारांत जाऊन काय जिन्नस घ्यावा? खेळायाचा जिन्नस तर मला नको, मिठाई घेतली तर ती खाऊन सरून जाईल; तिचा पुढें कांहीं उपयोग नाहीं. तर ह्या पैशांचे कागद विकत घ्यावे, म्हणजे मी घरीं असेन त्यावेळेस जें शिकलों आहें तें त्या कागदांवर लिहून ठेवीन, तेणेंकरून माझें शिकणें दृढ होईल. असा विचार करून बाजारांत गेल्यावर खिशांत पैसे पाहतो तों पैसे नाहींत. खिशास भोंक होतें त्यांतून ते गळून पडले होते. तें पाहून तो फार रडूं लागला, आणि आल्या वाटेनें पैशांचा शोध करीत माघारा चालला. वाटेनें रडत चालला आहे, इतक्यांत कोणी साहेब तेथें आला, आणि मुलगा कां रडतो हें समजून घेऊन त्यास दटावल्यासारखें करून म्हणाला, मुला, चल मजबरोबर. रामचंद्रानें ते शब्द एकतांच डोळे उघडले, आणि साहेबाची रागीट मुद्रा पाहून भयानें रडणें सोडिलें. साहेबाचे घर जवळच

होतें; तिकडे साहेबाबरोबर रामचंद्र गेला, त्यास साहे-
बानें विचारिलें कीं, तूं कां रडतोस? रामचंद्र बोलला,आ-
ज मी शाळेंतून घरीं आल्यावर बापानें मला चार पैसे दि-
ले,ते घेऊन बाजारांत कागद घ्यावयाकरितां निघालों,
तों वाटेनें पैसे मजकडून हरवले,म्हणून मी रडत हो-
तों. साहेबानें त्याचें बोलणें ऐकून घेऊन त्या मुलासदोन
आण्याचे पैसे दिले, आणि सांगितलें कीं,ह्या पैशांचे कागद
किंवा दुसरें कांहीं जें तुला पाहिजे तें विकत घे. रामचंद्रा-
नें पैसे पाहातांच संतुष्ट होऊन डोळे पुसून, साहेबास
सलाम केला. मग तो बाजारांत जाऊन कागद विकत घे-
ऊन घरीं गेला, आणि झालेलें वर्तमान आईबापांस
सांगता झाला. ह्यापासून त्यांस किती आनंद झाला अ-
सेल बरें?

सारांश. मुलांनीं ह्याप्रमाणें चांगली बुद्धि धरून
आईबापांच्या अंतःकरणास वारंवार आनंद द्यावा
हा त्यांचा धर्म होय.

---

# १० झटून काम करणें.

एक कुळंबी मरतेसमयीं आपल्या मुलांस म्हणाला, मुलांनो, माझें पुष्कळ धन द्राक्षीच्या मळ्यांत पुरलेलें आहे. तो कुळंबी वारल्यावर त्याच्या मुलांनीं एकत्र होऊन तो ठेवा उकरून काढावा म्हणून द्राक्षीचा सारा मळा खणिला; कांतर, ठेवा अमुक ठिकाणीं पुरला आहे, हें बापानें त्यांस स्पष्ट सांगितलें नव्हतें. शेवटीं त्यांनीं ती जमीन कमरे इतकी खणली, तरी तींत ठेवा सांपडला नाहीं. मग खाडे बुजवून त्यांनीं त्या जाग्यावर द्राक्षीच्या नव्या वेली लाविल्या; त्यांस त्या वर्षी वीसपट पीक आलें. त्यांच्या उत्पन्नांतून सर्व खर्च भागून पुष्कळ द्रव्य शिलकेस राहिलें. तेव्हां त्या मुलांस समजलें कीं, द्राक्षीच्या मळ्यांत माझें धन पुरलेलें आहे, असें जें बापानें आपणांस सांगितलें होतें, त्याचा अर्थ हाच होतो कीं, झटून काम करा म्हणजे तुम्ही धनवान् व्हाल; कां कीं, उद्योग हा संपत्तीचें मूळ कारण म्हटलें आहे.



## ११ विद्येची हेळणा.

एक मुलगा विद्याभ्यासाचा उद्योग कांहींएक नकरितां आपल्या इच्छेस येई त्याप्रमाणें काळ घालवीत असे, आणि वडिलांच्या चांगल्या उपदेशाचा तिरस्कार करून वाईट लोकांच्या सोबतीनें फिरत असे. मग तो मोठा झाला. तेव्हां अन्नवस्त्र मिळेना, म्हणून महिन्याचे दोन रुपये कबूल करून एके ठिकाणीं चाकरीस राहीला; तिजपासून शरीरास फार श्रम होऊं लागले. पुढें तो एके दिवशीं आपल्या भावाजवळ जाऊन दीनवाणीनें त्यास विचारूं लागला, दादा, तुम्हांस थोड्या श्रमानें दरमहिन्यास दाहा पंधरा रुपये मिळतात, आणि मी तर सारा दिवस काम करीत असतों, व तुमच्यापेक्षां मला मेहनतही अधिक पडते, तरी मला दोन तीन रुपयांहून कांहीं अधिक मिळत नाहीं, ह्याचें कारण काय बरें? भावानें उत्तर केलें, रे, लहानपणी त्वां विद्येची हेळणा केली, विद्या संपादिली नाहीं, म्हणून आतां संकटांत पडला आहेस. आणि म्यां फार मेहनत करून विद्या संपादिली, म्हणून मला आतां चांगला रोजगार मिळाला आहे. ह्या विद्वानाचे तोंडांतून

ऐकिलें आहे कीं, विद्या म्हणते, जे माझी सेवा करतील त्यांस मी भाग्य देईन. त्वां पहिल्यानेंच गोष्ट गमाविली, आतां विचारून फळ काय?

सारांश जी मुलें लहानपणीं विद्येची हेळणा करितात, आणि आईबापांचा तिरस्कार करून, आणि स्वच्छंदपणें वागून, आपला विद्या शिकण्याचा काळ फुकट गमावितात, तीं मोठेपणीं फार संकटें पावून फजीत होतात, ह्यास्तव विद्येची हेळणा कोणीं करूं नये.

---

## १२ आळशी मुलगा.

कोणी एक आळशी मुलगा एका शहाण्यास म्हणाला, महाराज, मला फार दुःख झालें आहे. मी एके दिवशीं फार उशीर होईपर्यंत निजून राहिल्यामुळें शाळेस आण्याचा वेळ गेला; तेव्हां म्यां आईबापांस सांगितलें कीं, आज उशीर झाला म्हणून आतां मी शाळेस जात नाहीं, उद्यां जाईन. हा माझा आळस पाहून त्यांनीं पंतोजीकडे जाऊन शाळेंतील मुलें आणून त्यांजकडून मला धरवून शाळेंत पाठविलें; शाळेंत गेल्यावर पंतोजीनें सर्वांदेखत मला शिक्षा केली.

असा त्यांनीं मजवर जुल्म केला. ह्या करितां आईबापांना कांहीं तरी खूब उगवावा असा बेत मी करीत आहे, परंतु सिद्धीस जात नाहीं; ह्याला कोणती युक्ति करावी? असें त्या मुलाचें बोलणें ऐकून शाहाणा म्हणाला, अरे, मुला, तूं केवळ मूर्ख आहेस, असें माझ्या ध्यानांत पक्कें आलें. मूर्ख लोक जोंपर्यंत बोलत नाहींत तोंपर्यंत त्यांचे गुण दोष कांहींच कळत नाहींत; परंतु एकवेळ त्यांच्या तोंडांतून शब्द बाहेर निघाले म्हणजे त्यांचें ज्ञान सर्वांस समजतें. अरे मूर्खा, तुझ्या लहानपणापासून ज्यांनीं सर्वप्रकारें तुझें बरें केलें त्या आईबापांस तूं शत्रू सारखें मानितोस, हा तुझा केवढा मूर्खपणा आहे! तर असें करूं नको; तूं आळस टाकून विद्या शीक, मग शत्रु कोण आणि मित्र कोण हें तुला समजेल.

सारांश. मुलें लहानपणीं विद्याभ्यासाविषयीं आळस करितात, आणि आईबापांचा द्वेष करितात, तेणेंकरून त्यांचें फार अकल्याण होतें; म्हणून आईबापांनीं त्यांस असें होऊं देऊं नये. जे लोक मुलांचे अतिशयित लाड करून त्यांस विद्याभ्यास होऊं देत नाहींत, व त्यांस सुमार्गी लावीत नाहींत, ते त्यांचे शत्रु होत.

---

## १३ द्रव्य इच्छिणारा मुलगा.

दोन मुलगे भाऊ भाऊ एके शाळेंत विद्याभ्यास करीत असत; तेव्हां एका व्यापाऱ्यानें शाळेंत जाऊन त्यांस विचारिलें, तुम्ही कोणी माझ्याजवळ चाकरीस राहातां? त्यांतून वडील मुलानें त्यास पुसलें, महिना काय द्याल? व्यापारी बोलला, पांच रुपये देईन; कारण कीं, काम फारसें नाहीं. माझ्या बरोबर जिनसांच्या यादी मात्र घेऊन फिरत असावें; मला तुमच्या लिहिण्या वाचण्याची कांहीं गरज नाहीं. मुलानें उत्तर केलें, बरें तर, मी आपल्या भावाशीं ह्या गोष्टीचा विचार करून काय तें तुम्हांस कळवीन. तें ऐकून व्यापारी त्या वेळेस घरीं गेला. नंतर तो मुलगा आपल्या धाकट्या भावाजवळ जाऊन त्यास विचारितो, रे, ऐकतोस, आपण विद्वान् होण्यास आणखी किती दिवस पर्यंत अभ्यास करावा लागेल, हें समजत नाहीं; ह्यास्तव मला वाटतें कीं, त्या व्यापाऱ्याजवळ चाकरीस राहावें, हें बरें आहे. तेथें फारसा लाभ नाहीं, तरी स्वार्थाच्या उपयोगीं उद्योग तर हातानें घडेल. धाकटा भाऊ बोलला, दादा, तुम्ही ह्या वेळेस विद्येपेक्षां द्रव्यविशेष मानितां खरें, परंतु पुढें आप-

त्या मूर्खपणाचा पश्चात्ताप पावला; ह्यास दृष्टांत सांगतों. कितीएक ब्राह्मणे बागवान् लोक आहेत, ते चांगले वृक्ष आपल्या बागांत लावितात; त्यांस फळें लवकर येत नाहींत खरी, परंतु त्यालोकांस आशा असते कीं, जेव्हां फळें येतील तेव्हां चांगलींच येतील. कोणी मूर्ख बागवान् असतात ते लवकर फळें यावीं म्हणून कितीएक वाईट वृक्ष लावतात; त्यांस फळें लवकर येतात खरीं, परंतु तीं फळें वाईट असतात. तसें विद्येपासून जे लाभ होतात ते चिरकाळानें होतात खरे, परंतु ते चांगले. इतर उद्योगांपासून जे लाभ होतात ते लवकर जरी झाले, तरी ते निकृष्ट. लहानपणांत द्रव्याकडे चित्त लावलें तर विद्या होत नाहीं, म्हणून ह्या काळीं विद्या सोडून दुसरा उद्योग धरूं नये, असें माझ्या बुद्धीस येतें. धाकट्या भावाचें बोलणें ऐकून वडील भावानें चाकरीस राहाण्याची आशा सोडून शाळेंत आपला अभ्यास चालविला.

सारांश. लहानपणीं विद्येपेक्षां पैका अधिक वाटतो, परंतु थोरपणीं ह्याचा पश्चात्ताप होतो. ह्यासाठीं मुलांनीं लहानपणीं इतर सर्व उद्योग सोडून विद्या संपादावी, म्हणजे थोरपणीं त्यांस फार लाभ होतील.

# १४ आळस.

आळस ही शरीरांत मोठी व्याधी आहे. आळसापासून मोठमोठे अन्याय, शोक, हानि, आणि अडचणी उत्पन्न होतात.

आळशी मनुष्य लबाडी बोलण्याविषयीं मोठा हुशार असतो. तो असा; जर त्यास आमच्यापाशीं जा म्हणून कोणी सांगितलें, तर तो लागलेंच उत्तर देतो कीं, तो घरांत नाहीं; जर त्यास कांहीं कोठून आणावयास सांगितलें, तर तो उत्तर देतो कीं, तें मिळत नाहीं हें मला ठाऊक आहे.

आळशी मनुष्य काम चुकावून उगीच सुस्त बसावें असें पाहात असतो. तो काम करावयाच्या उपयोगी नाहीं. तो आपल्या कामांत चित्त ठेवीत नाहीं; म्हणून त्याची संपत्ति आणि सुख नित्य उणीं होत जातात. आळशी मनुष्य केवळ दुराचरणाच्याच उपयोगीं.

आळशी आहेत तितके दुसऱ्याच्या सुखांत भागतात; आणि पराधीनपणें राहून आपला तोटा करून घेतात; म्हणून एखादी वस्तू त्यांच्या जवळ जरी असली, तरी दुस-

त्याच्या साहाय्यावांचून ती त्यांस प्राप्त होत नाहीं.

ह्या साठीं सर्वांस हें योग्य आहे कीं, योग्यते प्रमाणें आपलें काम आळस सोडून आपण स्वयें पाहात असावें.

---

## १५ लोभ.

लोभानें पापवासना उत्पन्न होते. अतिलोभानें सर्व जातें. लोभ नाशाचें कारण होय, म्हणून अतिलोभ कोणीं धरूं नये.

कोणी एका गृहस्थाच्या बागांत एक सिताफळीचें झाड इरसाल होतें. त्यास फळें चांगलीं येत असत. त्यांतून कितीएक फळें प्रतिवर्षी तो गृहस्थ राजास नेऊन देत असे, म्हणून त्याफळांवर राजाची फार आवड बसली होती. एके दिवशीं राजानें मनांत आणिलें कीं, ह्या सिताफळांचें झाड आपल्या बागांतच आणून लावावें, म्हणजे त्याचीं सर्व फळें आपणास मिळतील, असा विचार करून त्यानें तें झाड तेथून काढून आपल्या बागांत नेऊन लाविलें. असें करतांच तें झाड लागलेंच मरून गेलें.

सारांश राजानें फार लोभ धरला ह्यामुळें इतकें झालें कीं, फळें गेलीं आणि झाडही नाहींसें झालें.

## १६ अविचाराचें फळ.

राधानाथ नामें एक मुलगा होता, त्याचे आईबाप त्याचे लाड फार चालवीत असत; आणि मनास मानेल तसें त्यास करूं देत असत, म्हणून वाईट रीति व दुर्गुण त्यास फार जडले. विद्या काय पदार्थ, व प्रतिष्ठा म्हणजे काय आहे, हें त्यास कांहींच कळत नव्हतें. आईबाप मारतील ह्या भयानें मात्र तो शाळेंत जात असे. त्याला द्वाड मुलांच्या सहवासानें द्वाडगुण लागून असें झालें कीं, कोणत्याही चांगल्या कामाकडे त्याचें चित्त लागू नये. ह्या प्रकारें तो दुराचरण, खोटें बोलणें, चोरी, तंटे, वगैरे ह्यांत दिवस घालवूं लागला. दुसऱ्या मुलांस आपल्या मंडळींत आणून आपल्या सारखें त्यांस करण्याचा उद्योग त्यानें आरंभिला. अशा कर्मांमुळें ईश्वर आपणास लवकरच शिक्षा करील, हें तो समजला नाहीं.

शाळेंतही त्याचा द्वाडपणा फारच असे पंतोजी

ज्या लेखण्या करून देई त्या गमावून दुसऱ्या मुलांवर चो-
रीचा आळ घाली. तो अक्षर कधीं वळवीत नसे, म्हणून
त्याचें अक्षर इतकें वाईट होतें कीं, त्याचें त्यासही वाच-
तां येऊं नये. जो धडा पंतोजी सांगे, तो मन लावून त्या-
नें कधीं पाठ करूंच नये. पंतोजी वारंवार रागें भरून
शिक्षा करी, त्याची लाज वाटत नसे; म्हणून त्यास कां-
हीं येत नसे. शेवटीं परीक्षेचे वेळेस तो सर्वांपेक्षां मूर्ख
ठरला, म्हणून शाळेंतून त्यास काढून दिलें.

एके दिवशीं कोणी गरीब माणूस आंबे घेऊन बा-
जारांत विकावयास जात होता, त्याची आणि राधाना-
थाची वाटेंत गांठ पडली; तेव्हां राधानाथानें त्या गरिबास
नकळतां त्याच्या पाटींतून कांहीं आंबे चोरून घेतले. घ-
रीं गेल्यावर बापानें त्यास विचारिलें, मुला, आंबे कोठू-
न आणले? राधानाथ लबाडीनें बोलला, मला बाजारां-
त कोणी दिले.

पुढें एके दिवशीं कांहीं कामाकरितां जवळच्या गां-
वीं जा म्हणून त्याच्या बापानें त्यास सांगितलें; तें न ऐकून
तो दुसऱ्या गांवास जावयास निघाला. वाटेनें नदीच्या
कांठीं एक मोठें झाड होतें, त्यावर मधाचें पोळें होतें. तें

झाडावया करितां तो झाडावर चढला. ज्या खांदीस मधीचें पोळें होतें ती खांदी बारीक होती, म्हणून तिला त्याचा भार साहुला नाहीं, त्यामुळें खांदी मोडून तो नदींत पडला. त्याचें प्रेत वाहत वाहत कोणीकडे गेलें हें कळलें नाहीं.

सारांश: अविचारानें फळ असें वाईट होतें त्यास्तव मुलांनीं लहानपणापासून विद्या संपादून जें करणें तें विचारानें करावें, म्हणजे वाईट परिणाम व्हावयाचा नाहीं. राधानाथाची गोष्ट जीं चांगलीं मुलें वाचतील त्यांस तशा मुलाचा कंटाळा येईलच.

---

## १७ शिवी गाळ.

ज्याचा स्वभाव वाईट तो शिवी गाळ देतो, आणि ज्याचा स्वभाव चांगला तो चांगलें बोलणें बोलतो.

एके राजपुत्रास कोणी एका गरिबाच्या मुलानें शिव्या दिल्या; म्हणून राजपुत्र रडत रडत बापाजवळ जाऊन त्यास म्हणाला, बाबा, आज मी खेळावयास गेलों होतों तेथें अमुक मुलानें मला मनास आल्या तितक्या

शिव्या दिल्या. राजानें तें ऐकून आपल्या सर्व प्रधानांस बोलावून विचारिलें कीं, अमुक मुलानें माझ्या पुत्रास शिव्या दिल्या, ह्या बद्दल त्यास कोणती शिक्षा करावी? तेव्हां कोणी सांगितलें, त्याला गांवांतून काढून टाकावें; कोणी म्हणाले, त्यास कैदेंत ठेवावें; कोणी म्हणाले, त्यापासून दंड घ्यावा; ह्याप्रकारें सर्वांचें बोलणें झालें. नंतर राजानें आपल्या पुत्रास सांगितलें कीं, मुला, मी राजा आहें; तुला ज्यानें शिव्या दिल्या त्यास पाहिजे ती शिक्षा करण्यास मी समर्थ आहें; परंतु मला वाटतें कीं, तूं त्या मुलास क्षमा करशील, तर फार चांगलें होईल. तेव्हां बापाच्या उपदेशावरून राजपुत्रानें त्या मुलाची क्षमा केली, आणि त्यास सांगितलें कीं, अरे, पहा, तुला शिक्षा करावयाचें माझे आंगीं सामर्थ्य असून मी ह्या वेळीं तुझी क्षमा करतों; तर तूं आतां दुसऱ्या कोणास शिव्या देऊं नको, आणि तुला कोणी दिल्या तरी त्या तूं सोसून घे.

सारांश. मुलांस लहानपणापासून सुनीति शिकवावी, म्हणजे त्यांचा स्वभाव शांत होतो. मग ते दुसऱ्यास शिवीगाळ देणार नाहींत. उलटें दुसऱ्यानें त्यांस शिवी दिली तरी ते त्याची क्षमा करतील.

## १८ कृतघ्नाचें शासन.

कोणीएक श्रीमंत गृहस्थ मोठ्या झुंजुरकीं घोड्या-
वर बसून शिकारीस निघाला होता, त्याच्या खिशां-
तील सोळा मोहरांची कागदाची पुडी त्यास नकळतां वा-
टेंत कोठें पडली, ती एका गरिबास सांपडतांच त्यानें ती
कोतवालाकडे नेऊन दिली. कोतवालानें तें वर्तमान गां-
वांत दवंडी पिटवून प्रसिद्ध केलें; तें ऐकून तो श्रीमंत चा-
वडीवर गेला, ते समयीं कोतवालानें त्यास त्या मोहरा
दिल्या; त्या घेऊन श्रीमंत म्हणतो, माझ्या आणखीही
कांहीं मोहरा पुडींत होत्या, त्यास ह्या ज्याजवळ सांपड-
ल्या त्याजवळ त्याही असतील.

त्यावरून कोतवालानें त्या गरिबास बोलावून आ-
णून विचारिलें, ते समयीं तो भ्याला, तरी त्यानें एकच
सांगितलें कीं, मला सांपडलें होतें तितकें सर्व मी तुम्हा-
कडे आणून दिलें; आतां मजकडे कांहीं राहिलें नाहीं. शे-
वटीं कोतवालानें असें केलें कीं, ज्या कागदांत मोहरा गुंडा-
ळल्या होत्या, तो कागद आणविला, आणि त्यांत त्या मो-
हरा गुंडाळून पाहतां त्याचे लक्षांत आलें कीं, ह्यांत सो-

ळा मोहरांहून अधिक मावत नाहींत. नंतर तो श्रीमंतास म्हणाला, अहो, ह्या पुडींत सोळा मोहरा आहेत, ह्या तुमच्या नव्हत, कां कीं, ह्या पुडींत अधिक मोहरा मावत नाहींत; ह्यासाठीं तुमची पुडी दुसऱ्या कोणास सांपडली असावी; तुम्ही तिचा दुसरे कोठें शोध करा. मग गरिबास म्हणाला, अरे, आतां ह्या सोळा मोहरा तुझ्या आहेत, ह्या घे, आणि घरास जा.

---

## १९ कृतघ्नाची खोड मोडणें.

एके शेतकऱ्यानें आपल्या कष्टानें द्रव्याचा संग्रह केला होता; तो म्हातारा झाला तेव्हां तें सारें द्रव्य त्यानें आपल्या मुलाच्या स्वाधीन केलें. मूल द्रव्याचा मालक होतांच त्यानें एक मोठें घर, वाडी, वस्त्रें, पात्रें, भूषणें, विकत घेतलीं; चाकर, बटकी, ठेविल्या, आणि संपत्तीचा डौल मिरवूं लागला. असें असतांही त्यानें आपल्या म्हाताऱ्या बापास लहानशा झोंपडींत ठेविलें होतें. तो बिचारा फुटक्या भांड्यांत जेवीत असे, आणि तीं आपल्या हातानें घांशीत असे. त्या म्हाताऱ्याचा नातू चांगला विचारी होता, तो आजा-

ची दशापाहून तो मोठा श्रमी होऊन त्यास म्हणाला, आ-जोबा, आह्मून तुम्ही फुटक्या भांड्यांतच खातां आणि तीं आपल्या हातानें घांसतां? म्हातारा म्हणाला, काय करूं बेटा? तुझ्या बापाला माझी दया येत नाहीं. नातू म्हणाला, आजोबा, जर तुम्ही माझें ऐकाल तर हीं भांडीं फोडून टाका, म्हणजे तुम्ही दुःखावेगळे व्हाल. म्हाता-रा म्हणाला, तें कसें होईल, बाळा? जर म्यां हीं भांडीं फोडलीं, तर तुझा बाप मजवर रागावेल, आणि माझे अ-धिकच हाल करील. नातवानें उत्तर केलें, आजोबा, माझी गोष्ट ऐका, ह्यापासून बरेंच निपजेल. मग म्हाताऱ्या-नें एके दिवशीं जेवण झाल्यावर मुलगा आणि नातूज-वळ पाहात असतां भांडीं घासतांना फोडून टाकिलीं. तेव्हां नातू हातांत काठी घेऊन त्यास मारावयास धांव-ला. तेसमयीं त्याचा बाप त्यास म्हणतो, रे, तूं वेडा तर नाहीं झालास? हें भलतेंच काय करतोस? त्यानें उत्तर दिलें, बाबा, मी नीटच करितों, कां कीं, ह्यानें आज हीं भांडीं फोडून टाकिलीं, आतां तूं ज्यां म्हातारा होशील, तेव्हां मी तुला दुसरी कोठचीं आणूं? म्हणून मी ह्यास मारीत होतों. बापानें मुलाचा अभिप्राय समजून म्हाता-

त्यास घरांत आणिलें, आणि त्याच्या सेवेस चाकर ठेवून दिले.

सारांश. वडिलांची सेवा करणें व त्यांचा मान राखणें ह्यास दोन कारणें आहेत. पहिलें, लहानपणीं आपलें पालन पोषण करून सर्वप्रकारें आपलें कल्याण त्यांनीं केलें; दुसरें, जसें आपण आपल्या वडिलांस केलें तसेंच आपल्या मुलांनीं आपणास करावें. म्हणून आईबापांचे उपकार विसरून जे कृतघ्न होतात त्यांस तसेंच रोकडें फळ देव देतो.

---

## ३० वृथा मनोरथ.

एका शिपायानें तुपाची घागर बाजारांत विकत घेतली; ती घरीं न्यावयाकरितां त्यानें एका मोलकऱ्यास चार आणे देऊं केले. मोलकरी ती घागर डोकीवर घेऊन चालला असतां, मोठा हर्ष पावून, आपणाशीं मनांत बोलतो कीं, ह्या घागरीचा हेल येईल त्याची मी एक कोंबडी घेईन; तिची वाढ पुष्कळ झाली म्हणजे सवड पाहून मी ती सारी विकीन; आणि त्या पैक्यानें एकशे-

ळी घेईन; ती व्याली म्हणजे तिचें दूध विकून कांहीं कु-
णगा करीन; मग शेळ्यांचा कळप वाढला म्हणजे तो
सारा विकून एक गाय घेईन; ती सांजसकाळ मिळून
साहा किंवा आठ शेर तरी दूध देईल; तें विकून मी बरे
च पैसे जवळ करीन; थोडक्या काळांत तिचे गोहरे व
गाज्या पुष्कळ झाल्या म्हणजे त्यांची किंमत पुष्कळ येई-
ल. ह्या प्रकारें मी मोठा श्रीमंत झालों म्हणजे एक सुंदर
रूपशील अशी नवरी पाहून तिशीं लग्न करीन; तिला
कांहीं वर्षांनीं मुलें होतील; मग मी कांहीं काम करणार
नाहीं; माझे चाकर सारे काम करतील; मी केवळ धनी-
पणा मात्र मिरवीन. एके समयीं माझा मुलगा येऊन
मला म्हणेल, बाबा, जेवावयास चला, तेव्हां डोकें हालवून
मी त्यास म्हणेन कीं, मी एव्हां येत नाहीं. असें त्यानें डो-
कें हालवितांच तुपाची घागर डोकीवरून खाली पडून
फुटून गेली. घागर फुटतांच शिपायानें त्यास वेताच्या
छडीनें बळकट मारलें.

ह्या गोष्टीपासून ही शिक्षा घ्यावी कीं, जर आ-
पण आपल्या अवस्थेस व योग्यतेस दुर्लभ असे मनो-
रथ केले, तर आपण निराश आणि श्रमीमात्र होऊं.

म्हणून ईश्वरानें जी स्थिति आपणास दिली आहे, ती तच आपण तृप्त असावें. व्यर्थ मनोरथ करणें वेडेपणा होय.



## २१ संगत.

दुष्टाची संगत केल्यानें आपले भलेपणास बट्टा येतो, इतकेंच केवळ नाहीं; त्याचे दुर्गुण आपणास लागतात. सोनें तांब्याच्या भांड्यांत घालून ठेवलें असतां आपला रंग सोडून तांब्याचा रंग घेतें. ह्यासाठीं ज्यापासून तुझें बरें होईल अशाची संगत धर. कां कीं, शहाण्याचे संगतीनें आपणास शहाणपणाची जोड होईल, आणि दुष्टाच्या संगतीनें आपण दुराचरणी होऊं. ह्याविषयीं एक गोष्ट आहे.

एका गृहस्थाचा मुलगा नाच तमाशे पाहाण्यांत व गाणें ऐकण्यांत मोठें सौख्य मानीत असे. एके दिवशीं तो रात्रीस एका घरीं गेला; आणि तेथील रिकाम्या चाकरा संगतीं लावण्या ऐकावयास बसला. त्या घरचा धनी तो गोंगाट ऐकून हातीं वेताची छडी घेऊन आला,

कितीएक दुसऱ्या लोकांसहवर्तमान एका झाडाचे छायें-त बसला होता, त्याचे हातांत एक पत्र होतें. तें पत्र त्या मंडळींतून एकाजणानें घेऊन वाचलें, तें ऐकून त्या म्हा-ताऱ्यास फारच हर्ष झाला. मी तेथें उभा राहून हें सर्व व-र्तमान पाहात असतां, म्हातारा मला हाक मारून म्हणतो, अहो, पाहा, माझ्या गोविंदानें मला हें पत्र व हुंडी पा-ठविली आहे. त्यावरून मी समजलों कीं, ती हुंडी व तें प-त्र म्हाताऱ्याच्या मुलानें म्हाताऱ्यास पाठविलें म्हणून त्या-ला एवढा हर्ष झाला आहे. नंतर त्याचें कांहीं विशेष वर्तमान समजून घ्यावें म्हणून मी त्या मंडळींतून एका जवळ जाऊन त्यास विचारिलें, तेव्हां त्यानें मुळापा-सून सविस्तर वर्तमान सांगितलें, तें तुम्हांस सांगतों.

त्या म्हाताऱ्या पुरुषाचें नांव राजाराम; तो पूर्वीं द्रव्यवान् होता; परंतु व्यापार बुडाला व कोणीएका साहेबानें त्याशीं लबाडी केली, ह्या कारणामुळें त्याचें सारें द्रव्य जाऊन केवळ भिकारी झाला. हेंच एक दुःख त्यास होतें असें नाहीं, दुसरें ही एक होतें; त्याचा वडी-ल मुलगा फार दांडगा आणि दुष्ट निवडला. तो बापाचें ऐकत नसे, आणि शाळेंत पंतोजीच्या सांगण्याचा अव-

मान करीत असे. पुढें तरुणपणांत त्याचे दुर्गुण असे वाढ-
ले कीं, जवळच्या मनुष्यांनीं त्याशीं बोलावयाचें देखील सो-
डिलें. त्याच्या समागमाच्या भयानें ते दूर राहूं लागले, आ-
णि ज्यांची त्यावर अत्यंत ममता होती त्यांसही त्याचा कं-
टाळा येऊन तो शत्रूसारखा दिसूं लागला. नंतर त्यानें
आपल्या सारख्या दोन लबाड मनुष्यांशीं सोबत केली;
मग त्या तिघांनीं मिळून निश्चय केला, कीं, सारे लोक आ-
पला कंटाळा करितात, आणि आपल्या हातानें तर दुसरें
काम होत नाहीं. ह्यास्तव आपण तिघे मिळून चोऱ्या क-
रीत जाऊं. असा संकेत झाल्यावर उघड चोरी करणें,
व लोकांचीं घरें फोडणें, ह्या कामांत दिवस घालवूं ला-
गले.

कांहीं दिवसांनीं त्यांस सरकारच्या माणसांनीं
चोरीच्या कामांत धरून चौकशी करितां नेलें; आणि
त्यांजवर चोरीचा गुन्हा शाबूत झाल्यावर त्यांस बंदी-
त ठेविलें. ते जन्मवर माती खोदण्याचें काम करून ते-
थेंच राहिले. ह्या दुःखामुळें तो म्हातारा फार उदास झा-
ला होता.

त्याच्या धाकट्या मुलाचें नांव गोविंदा, तो फार सु-

शील मुलगा होता, आणि दुसऱ्या द्वाड आळशी पोरां बरोबर खेळणें, किंवा दुराचरण करणें, हें त्यास आवडत नसे. तो दररोज दोन वेळां शाळेंत जात असे, आणि इतर मुलांपेक्षां अधिक अभ्यास करून त्यानें चांगली प्रतिष्ठा मिळविली होती. कोणा मुलांशीं कज्जा भांडण, किंवा मोठ्यानें बोलणें, हें तर त्याला अगदीं ठाऊकच नव्हतें. दुसऱ्या मुलांच्या चाहाड्या तो गुरूस सांगत नसे. उलटा त्यांचा तंटा मिटविण्याविषयीं प्रयत्न करीत असे. गुरूचा राग होईल असें कर्म तर त्याच्या हातून कधींच घडलें नाहीं. तो सर्वकाळ गुरूच्या आज्ञेंत राहून त्याची प्रीति आपणावर ओढून घेत असे. ज्या मुलांस धडा समजण्याची शक्ति नसे, त्यांस तो सुलभरीतीनें समजावून देई; म्हणून शाळेंतील साऱ्या मुलांस तो फार आवडूं लागला. असा तो मुलगा सर्वांशीं स्नेह जोडून वाचणें, लिहिणें, आणि दुसऱ्या मोठमोठ्या विद्या ह्यांत प्रवीण झाला होता; म्हणून विद्वान् लोक त्याची गणना पंडितांत करूं लागले.

तो मुलगा सकळ विद्यांत परिपूर्ण होऊन शाळेंतून निघाल्यावर, लागलेंच एके साहेबानें त्याची कीर्ति ऐ-

कून त्यास कांहीं एका कामावर नेमण्याकरितां त्याच्या बापास पत्र पाठविलें कीं, जर तुम्ही आपल्या पुत्रास आम्हाकडे पाठवाल, तर आम्ही त्याचें पाळण करूं, आणि त्याच्या विशेष विद्याभ्यास व त्याचें सर्व प्रकारें कल्याण होण्याविषयीं प्रयत्न करूं. त्या पत्रांतील मजकूर समजून घेऊन म्हातारा राजाराम ह्यानें आपल्या मित्रांसह वर्तमान विचार करून, मुलास साहेबाकडे पाठवावें हें योग्य आहे, असा निश्चय केला. परंतु पुत्राच्या ममतेमुळें त्याचें जाणें त्या म्हाताऱ्यास केवळ दुःखास कारण झालें होतें. म्हणून त्यास तो संमतही देत नव्हता; परंतु त्याचे जे स्नेही होते त्यांनीं समजावून सांगितल्यावरून त्यानें मन कठोर करून पुत्रास जाण्याची आज्ञा दिली. आज्ञा देण्याचें कारण हेंच कीं, मुलानें रोजगार करून कांहीं द्रव्य मिळविलें तरच आपला चरितार्थ चालेल, असा त्यानें विचार केला. नंतर मुलाच्या जाण्याचा समय आला तेव्हां त्याचा म्हातारा बाप आपले सर्व स्नेही बरोबर घेऊन मुलास पोहोंचवून परत आला; तेव्हां सर्वांस वाईट वाटलें; आणि त्याच्या सहवासाचे जे विद्यार्थी होते त्यांस तर फारच खेद झाला. पुढें गोविंदा आपल्या बापापासून निघाल्यावर

रोजगाराचे ठिकाणीं जाऊन त्या साहेबास भेटला. साहेबानें त्यास पाहातांच संतुष्ट होऊन त्याचा चरितार्थ चालावया जोगा रोजगार त्यास सांगितला.

ह्या गोष्टीस सुमारें एक वर्ष झालें, इतक्यांत गोविंदावर तेथील सर्व लोकांची प्रीति त्याच्या गांवच्या लोकांप्रमाणें बसली, आणि तोही विद्येंत आणि कामकाजांत उत्तरोत्तर अधिक हुशार होत चालला. पूर्वी म्हातान्यास पत्र आलें, म्हणून जें सांगितलें तें ह्याच गोविंदानें पाठविलेलें पत्र, त्या पत्राबरोबर त्यानें आपल्या बापास खर्चा करितां रुपयांची हुंडी पाठविली होती, त्या पत्रांत गोविंदानें बापास असें लिहिलें होतें कीं, माझा पगार वाढविण्याचा मानस साहेबांचा आहे, दुसरें, तुम्ही वृद्ध, व माझा भाऊ अज्ञान, तुम्हां उभयतांची मला फार काळजी वाटते. आणखी असें लिहिलें होतें कीं, ज्याच्या कृपेनें मला विद्या येऊन जितका थोरपणा प्राप्त झाला, त्या गुरुमहाराजांच्या चरणीं माझे साष्टांग नमस्कार सांगावे. त्याचा उपकार मला त्यावेळेस कळत नव्हता, परंतु आतां कळूं लागला. आणखी त्यानें आपल्या सोबत्यांस लिहिलें होतें कीं, तुम्ही थोडाही काळ व्यर्थ घालवूं नका. ह्या समयां-

त जर तुम्ही विद्या संपादिली नाहीं, तर जन्मवर दुःख पावाल.

सारांश जीं मुलें ही गोष्ट वाचून वाईट गुण टाकतील, आणि गोविंदाप्रमाणें आचरण करतील, तीं त्याच्याप्रमाणें सुखी होतील. आळस जो आहे तो दुःख आणि कष्ट ह्यांचें घर आहे. पाहा, पाहा, जितके आळशी तितके श्रमी व दुःखी होतात. ह्यास्तव लहानपणीं, आळस सोडून जर विद्याभ्यास केला नाहीं, तर जन्मवर संकटें चुकणार नाहींत.



## २४ खरेपणा आणि प्रामाणिकपणा.

खरेपणा हा गुण सर्व मनुष्यांमध्यें अवश्य असला पाहिजे. मनुष्यानें खरेपणानें वागावें, खोटें बोलणें इत्यादि वाईट कर्में करूं नयेत अशी ईश्वराची आज्ञा आहे. बाळपणांत जे चांगले किंवा वाईट गुण जडतात, ते तसेच थोरपणांत राहतात, आणि ते उत्तरोत्तर वाढत जातात, म्हणून लहानपणापासून खरें बोलण्याचा अभ्यास ठेवावा.

एके समयीं कोणी दोन मुलगे शाळेस जात होते, तों वाटेवर तमाशा होत होता तो पाहावयास ते उभे राहिले, त्यामुळें शाळेचा समय चुकला. नंतर दोघेही शाळेंत गेले, तेव्हां गुरूनें दोघांतून एकास उशीर होण्याचें कारण विचारिलें. त्यानें जें खरें होतें तें सांगितलें. त्याजवरून गुरूनें हा खरें बोलला असें जाणून रागें न भरतां त्यास चांगल्या रीतीचा उपदेश केला, आणि पुनः असें करूं नको म्हणून सांगितलें; दुसऱ्या मुलास उशीराचें कारण विचारिलें, त्यानें उत्तर केलें कीं, माझ्या बापानें मला कामास पाठविलें होतें; तें ऐकून गुरू त्या वेळेस त्याला कांहीं बोलला नाहीं. इतक्यांत सहज त्या मुलाचा बाप तेथें आला, त्यास गुरू म्हणाला, तुम्ही शाळेच्या वेळेस मुलास दुसरीकडे कां पाठवितां? बापानें उत्तर दिलें, मी त्यास कोठें पाठविलें नाहीं. त्याजवरून हा लबाड आहे, अशी गुरूची खातरी होऊन त्यानें त्या लबाड बोलणाऱ्या मुलास छडी खालीं खूप मार दिला.

कोणी मनुष्य एकदां खोटें बोलूं लागला, म्हणजे मग तो जरीं खरें बोलला, तरी त्याचा विश्वास कोणी

धरीत नाहीं. इतरांच्या नुसत्या बोलण्यावर जितका विश्वास ठेवितां येतो, तितका लबाडाच्या शपथेच्या बोलण्यावर ही ठेवितां येत नाहीं.

कोणी धनगराचा पोर, लांडगा आलारे, लांडगा आला, असें लटकेंच ओरडून आसपासच्या लोकांस उगीच हाका मारी. तेव्हां ते जाऊन पाहात तों लांडगा नाहीं, कांहीं नाहीं. असे ते बहुतवेळां फसून परत गेले. एकवेळ लांडगा खराच आला, तेव्हां त्या पोरानें पुष्कळ आरोळ्या मारल्या असतांही कोणी धांवून आला नाहीं. शेवटीं लांडगा त्याचीं सर्व मेंढरें खाऊन गेला.

जो खरें बोलतो तो कोठें गेला तरी त्याच्या मनांत भय असत नाहीं; त्याचें बोलणें एकच असतें कधीं कोठें अंतर पडत नाहीं. जो खोटें बोलतो त्याच्या मनांत भय असतें. तो एके ठिकाणीं एका प्रकारचें बोलतो दुसऱ्या ठिकाणीं दुसऱ्या प्रकारचें बोलतो. तेथें कदाचित् त्याचें पूर्वींचें बोलणें ऐकिलेला कोणी असला, म्हणजे तो त्याची लबाडी त्याच्या पदरीं घालतो. मग आपली लबाडी उघडी पडली जाणून तो अनेक रीतींनीं संपादणी करावयास लागतो, तों त्याचें खोटेपण अधिकच उघडीस

येतें मग त्याचा कोणी विश्वास धरीत नाहीं.

प्रामाणिकपणा ह्याचा अर्थ असा, कीं जो व्यवहार करावयाचा तो चोख असावा त्यामध्यें कपट नसावें हा गुण लहानपणांपासून मुलांनीं दृढ धरावा, म्हणजे प्रौढपणांत त्यांस संसारामध्यें संकटें प्राप्त होत नाहींत. कोणा मुलाची वस्तु नकळत घेणें, एकाची चहाडी दुसऱ्यास सांगणें, किंवा खोटें बोलून दोघांत तंटा उत्पन्न करणें, ह्या गोष्टी मूलपणामध्यें मोठ्याशा वाटत नाहींत, परंतु ह्याच खोडी वाढून पुढें मोठेपणीं दरवड्यामध्यें किंवा फंदफितुरांमध्यें सांपडून फांशी जावें, अथवा घरदारास मुकून जन्मभर कैदेंत पडावें, असें त्याचे परिणाम होतात. असें झाल्यावर लोकांस पश्चात्ताप होतो. ह्याचा विचार पूर्वींच जे करितात, आणि खरेपणानें वागतात, त्यांची कीर्त्ति व प्रतिष्ठा सर्वत्र होते.

सारांश. बाळपणापासून सर्वांनीं खरेपणा व प्रामाणिकपणा धरावा. कसाही प्रसंग आला असतां त्यास सोडूं नये



## २५ जीभ आटोपणें

जीभ हाडावांचून केली आहे. म्हणून ही मऊ आहे, असें असतांही कोणेसमयीं कठोर होते, ही गोष्ट किती वाईट आहे बरें ! पाहा कीं, जीभ आपण होऊन कांहीं कडू पदार्थ पोटांत जाऊं देत नाहीं. जे गोड आणि चांगले पदार्थ त्यांचीच आवड हिला फार आहे. असें असतां हिनें दुसऱ्यास कडू बोलावें काय? आणि जें वाईट तें बाहेर काढावें काय? कायहो विपरीत हें ! कीं चांगलें बोलावयाची शक्ति हिजमध्यें असून हिला वाईटबोलणें बरें वाटतें ! चांगलें बोलण्यास वाईट बोलण्याहून कांहीं अधिक खर्च आहे असें म्हणावें, तर तसेंही नाहीं.

जिभेचा बरेपणा आणि वाईटपणा काय सांगावा ! ही स्वाधीन राखिली, तर सर्वलोकांस वश करील; आणि जर स्वाधीन ठेविली नाहीं, तर निर्मळ आणि भलां असाही जरी आपला मित्र आहे, तरी त्याच्या अंतःकरणांत द्वेष उत्पन्न करील. कोणेवेळेस ही शाहाणपणानें आपले प्राण वांचविते; कोणेवेळेस अन्यायानें आ

पला घात करून घेते; कोणेसमयीं ही मोठा कज्जा पेट-
विते; कोणें समयीं विझविते. हीच एखाद्यास स्तवील किं-
वा निंदील; हीच मैत्री जोडील किंवा तोडील; हीच प्रीति
वाढवील किंवा द्वेष उत्पन्न करील. ही उगी न राहून आप-
लें अनहित करील. एकादे वेळेस मनांतील गुह्य गोष्ट प
टकन् उघड करील. कोणे वेळेस आपणाला मोठेपणा
आणावयाकरितां भल्याशीं द्वेष करून आपण निंदेचें पा-
त्र होईल. कोणेसमयीं खरें स्थापावयाच्या मागें लागून
आपल्या थोरपणास बट्टा लावील, आणि त्या खऱ्याविष-
यीं लोकांच्या मनांत खोटेपणाचा संशय उत्पन्न करील.
जसें बांधणावर बांधण आवळलें असतां खालचें ढिलें
होतें, आणि त्याचा बळकटपणा जातो, तसें जें खरें आ-
हे तें अधिक अधिक स्थापावयास लागलें असतां, त्या-
च्या खरेपणाविषयीं संशय उत्पन्न होतो. कोणे वेळेस
ही जीभ आपल्या मित्राचें गूज त्याच्या शत्रूस कळवून
त्याची कृपा संपादावयास जाईल, तों इकडे मित्राविष-
यीं प्रतारणा आणि कपट केलें म्हणून अन्यायी होईल.

जें वर सांगितलें त्याचा सारांश सांगतों, कीं आ-
पण जेवढें ऐकतों तेवढें सांगण्याचें, किंवा जेवढें जाण-

तों तेवढें सारें नेहमीं उघड करण्याचें प्रयोजन नाहीं. जितकें चांगलें व उपयोगी तितकेंच बोलावें. बहुत बोलण्यांत बहुत लबाडी निपजती, म्हणून खाण्यांत तसें बोलण्यांत ही बंधारण असलें तर आपला तोटा व्हावयाचा नाहीं. ज्याच्यानें आपली जीभ स्वाधीन ठेववत नाहीं, तो कधींही सुखी होणार नाहीं. जो मनुष्य शब्दानें कोणास दुखवीत नाहीं, तो थोर म्हणावा. ज्यानें जीभ स्वाधीन ठेविली, तो आपलें सर्व शरीर स्वाधीन ठेवील. पाहा कीं, आपण घोड्याच्या तोंडांत लगाम घालतों, तेणें करून तें आपल्या स्वाधीन राहातें. मग त्याचें शरीर आपण पाहिजे तिकडे फिरवीतों. तसेंच तारूं एवढें मोठें असतां, आणि त्यास प्रचंड वारा ओढीत असतां, लहानशा सुकाणानें सुकाण्या जिकडे वळवील तिकडे तें वळतें. तशी जीभ लहानसें इंद्रिय आहे, पण मोठमोठ्या गोष्टी करण्यास समर्थ आहे, तें स्वाधीन ठेविलें पाहिजे. पाहा कीं, अग्नि प्रथम लहानसा दिसतो, पण कोपला म्हणजे मोठें अरण्य जाळून टाकितो. तशी जीभ ही कोणी आग आहे, ही कदाचित् साऱ्या शरीराचा नाश करून टाकिते. अशा प्रकारची ही जीभ आपल्या इंद्रियांमध्यें मोठी मात्र आहे. हिला स्वाधीन ठेवी-

ल तोच शूर म्हणावा. सर्वप्रकारचे पशु, पक्षी, सर्प, आणि जलचर, ह्यांस मनुष्य हरतऱ्हेनें वश करितें, परंतु जीभ कोणाच्यानें वश करवत नाहीं. हिजपासून मोठमोठे अनर्थ होतात; हिजमध्यें जलाल विष भरलें आहे असेंही कधीं कधीं दिसतें. ह्या जिभेनेंच आपण आपला कर्ता जो परमेश्वर त्यास स्तवितों, हिनेंच आपली भावंडें जीं मनुष्यें, जीं देवानें आपल्या सारखीं घडलीं आहेत, त्यांस आपण निंदितों. एकाच मुखावाटे स्तुति आणि निंदा निघतात, हें मोठें आश्चर्य आहे. अहो, गोड पाणी आणि खारें पाणी एकाच झऱ्यांतून निघतात काय? आपणा मनुष्यांस योग्य आहे कीं, कोणास बोलून त्रास देणें, उपहास करणें, व क्षोभविणें, ह्यांपासून आपण आपली जीभ आटोपावी. तसेंच कठोर भाषण, निंदा, चुगली, आणि लबाड बोलणें, ह्यांपासूनही आपण आपली जीभ आटोपावी; आणि जें भाषण दुसऱ्याचे चांगल्या उपदेशास व साहित्यास उपयोगी; जें नीतीचें, जें दुसऱ्यास चांगले गुण लावणारें, जें खरें आणि गोड, तेंच बोलावें. अशा भाषणानें व भिडस्तपणानें आपण सर्वत्र शोभा आणि कीर्ति पावूं. असें असतां आपण वेडेपणानें कडू आणि कठोर शब्द बोलून दुसऱ्यास क्रोध का

उत्पन्न करावी तसेंच असत्य आणि अपशब्द बोलू-न देवाचा कोप आपणांवर कां घ्यावा? जर आपला मित्र वाईट कर्म करितां आपणास आढळला आणि त्याविषयीं आपण त्यास कांहीं बोलणार, तर त्यास प्रीतीनें व गोडी गुलाबीनें बोलावें, तरच तो आपलें बोलणें घेईल, लाजेल, आणि सुधारेल. गोड बोलण्यानें दुसरा आपल्या स्वाधीन होतो, कडू बोलण्यानें आपण दुसऱ्याच्या स्वाधीन होतों. जो गोड बोलणारा तो सर्वांस स्वचीन आवडता होईल. कडू आणि कठोर शब्द कोणास आवडत नाहींत, म्हणून तसे शब्द जर बोललों, तर आपली मर्यादा लोक राखणार नाहींत.



# २६ सुखाचें मूळ.

एका विद्वान् पुरुषानें फार पुस्तकें वाचून ज्ञानाची मोठी जोड केली. मग तो निरंतर ध्यानस्त असे, ह्यामुळें त्याचें मन भ्रमिष्ट झालें होतें. कदाचित् स्वस्थ झालें तर होई. आणि त्याच्या मनांत असें येई कीं, सारें जग सुखी आहे, आणि मी मात्र दुःखी आहें.

एके दिवशीं तो बहुत दुःखित होऊन निजला; मग त्यास स्वप्न पडून, त्यानें पाहिलें कीं, एक पुरुष आपल्या हातीं आरसा देऊन बोलतो, अरे ह्या आरशानें तुझ्या सर्व दुःखाचा परिहार होईल. ह्या आरशांत सर्वांचीं अंतःकरणें तुझ्या दृष्टीस पडतील, तीं पाहिल्यावर तुला जर इच्छा झाली कीं, आपली स्थिति आहे ती टाकून दुसऱ्या भलत्या कोणाची घ्यावी, तर तूं तसें सुखें कर.

मग तो विद्वान् आरसा घेऊन बाजारांत गेला, तेथें त्यानें पुष्कळ लोक पाहिले. त्यांत कितीएक लोक उंच वस्त्रें पांघरून गाड्यांत, पालख्यांत, घोड्यावर, हत्तीवर बसले आहेत; कितीएक पायांनीं चालत आहेत, ज्यांच्या मागें पुढें पुष्कळ चाकरलोक आहेत. तेव्हां लागलेंच

विद्यानानें आरसा लावून पाहिलें, तों त्यांत त्या त्या लोकांचीं अंतःकरणें त्याच्या दृष्टीस पडलीं. त्यावेळीं त्यानें असें पाहिलें कीं, कितीएकांचें मन्न लौकिकाच्या हानीमुळें दुःखित झालें आहे; कितीएकांचें कलहानें; कितीएकांचें व्यर्थ आशेनें; कितीएकांचें इष्टमित्रांच्या वियोगानें; कितीएकांचें रोगानें; स्वजनाच्या शोकानें, मैत्री तुटल्यानें; कोणाचें लोभानें; कोणाचें क्षोभानें, कोणाचें मत्सरानें; क्रोधानें, दुःखित झालें आहे; अशींच दुसरीं कांहीं दुःखें, जीं कोणास सुटलीं नाहींत, तींहींकरून युक्त आहे. असें मनुष्यमात्राचें अंतःकरण त्यानें दुःखानें भरलेलें पाहिलें. नंतर तो राजसभेस गेला; तेथेंही त्यानें आरसा लावून पाहिलें कीं, कितीएक राजाच्या भयानें कांपताहेत; कितीएक आपली पदवी जाते म्हणून घाबरले आहेत; कितीएक राजापासून अधिकार पावून दूर गेले असतां त्याच्या प्रजेवर सिंहासारिखे गर्जणारे, तेच राजापुढें कोल्ह्यासारिखे भीत आहेत; आणि चोरांसारिखे ओशाळत आहेत; कितीएकांनीं लोकांत थोरी मिळावयाकरितां विश्वासघात करून राजाचे वसुलाचें द्रव्य उधळून टाकिलें, म्हणून बंदिशाळेंत पडले आहेत; आणि म्हणताहेत कीं, आम्ही

ह्या लोकांमध्यें राहून असें जें हें दुःख भोगतों, ह्यापेक्षां आम्ही मेलों असतों तर बरें झालें असतें.

नंतर तो एका लग्नसमारंभांत गेला, तेथें त्यानें पाहिलें कीं, कितीएक आपल्या मुलांस खावयाची विपत्ति आहे म्हणून दुःखित आहेत, कितीएक मुलें मेलीं म्हणून कितीएक मुली मेल्या म्हणून, कितीएक जांवई वारले म्हणून; कितीएक मुलांचीं लग्नें करीं होतील म्हणून चिंता करितात; कितीएक योजिलेलें लग्न मोडेल कसें म्हणून काळजी वाहातात; कितीएक बायका मेल्या म्हणून कष्टी कितीएक चाकऱ्या नाहींत म्हणून सचिंत होतात; कितीएक आहेत चाकऱ्या त्या जातील म्हणून भिताहेत. कितीएक आपलीं जाती, कुळी, ह्यांची प्रतिष्ठा वाढावी म्हणून नानाप्रकारचीं उलाढालीं करून आपलें मन व्यग्र करिताहेत; कितीएक आपल्या जातिकुळाच्या अभिमानानें लोकांत दाखविताहेत कीं, आपण प्रतिष्ठित आणि चोख आहों; परंतु आंतून तर आपल्या सोयऱ्यां संगतीं आपणास कोणी पाहील म्हणून भिताहेत. आपला खोटेपणा छपवावा म्हणून ते दुसऱ्यांस वारंवार दोष लाविताहेत, आणि त्यांस चौघांत निंदून आपणास प्रतिष्ठितपणा साधताहेत, इत-

केंहीकरून शेवटीं ते एकांतीं आपल्या कुळाचा नीच-पणा, हलकेपणा, व अपवित्रपणा पाहून दुःखित आणि संतप्त होताहेत.

ह्या प्रमाणें मनुष्यमात्रांचीं आंतील दुःखें आणि संकटेंही बाहेरील थाटमांड व चोखकपणाच्या गोष्टी ह्यांनीं झांकलेलीं आहेत. इतकें पाहून तो विद्वान् जागा झाला; आणि परमेश्वराचा स्तवकरून म्हणाला, हे भगवान्, मजवर हा तुझा मोठा अनुग्रह, की त्वां मला हें म्यां पाहिलें ह्यांतील कोणासारिखें केलें नाहीं, ह्या साठीं देवाधिदेवा, मी तुझा उपकारी होऊन तुला विनंती करितों कीं, आजपासून कधींही वेडा होऊन, माझी पदवी किंवा अवस्था आहे ती जाऊन दुसऱ्या कोणाची यावी, अशी वांच्छा म्यां करूंनये एवढें मला दे. ह्याप्रकारें तो विद्वान् अनेक पदवींच्या मनुष्यांचीं अंतःकरणें पाहून मनांत लज्जित आणि कुंठित झाला, आणि त्यानें आपणास मी मोठा भाग्यवान् असें मानिलें.

ह्यासाठीं, सुख हें बाहेरील बढाई दाखविण्यांत किंवां संपत्तींत नाहीं. मनाच्या मांडणीवर आहे. जशी त्या विद्वानानें कल्पित आरशानें आपली सुखावस्था पाहिली,

तसा विचारी मनुष्य जर आपल्या बुद्धीचा आरसा करून पाहील, तर त्यास दुसऱ्याच्या व्यथा सहज दिसतील. आणि त्याचा संशय उडून जाऊन तो आपलें दैव आणि अवस्था ह्यांवर संतुष्ट राहील. मग तो दुसऱ्याचा हेवा करणार नाहीं, आणि अमक्यासारिखें आपण असावें, असें इच्छिणार नाहीं. रोग, शोक, मृत्यु, हीं सर्वांच्या वांट्यास आहेतच. पण एकादा शेती आपल्या झोंपडींत जें वास्तविक सुख भोगील, तें राजासही राजमंदिरांत होणार नाहीं. आपण एकाद्याचें बाहेरील वैभव पाहून त्याचा हेवा करितों; परंतु त्याचें अंतर्यामीचें दुःख जाणत नाहीं. मोराविषयीं लोकांच्या म्हणण्यांत असें आहे कीं, त्याच्या सुंदर पंखांची शोभा पाहून लोक कौतुक करितात, परंतु तो कधीं आपल्या ओंगळ पायांकरितां आपली मान खालीं घालतो.

